**शासकीय आश्रमशाळा / शासकीय वसतीगृहे / अनुदानीत आश्रमशाळांमध्ये कॉफीटेबल बुक स्वरुपात चित्रमय पुस्तक उपलब्ध करुन देणे संदर्भातील माध्यम आराखडा अंमलबजावणीसाठी वित्तीय व प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## आदिवासी विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांक : शाआशा-२०२२/प्र.क्र.९/का.१३अ**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

**दिनांक: १५ मार्च, २०२२**

वाचा :-

सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक :-मावज-२०२१/प्र.क्र.१२६/का.३४, दिनांक १३/०८/२०२१

प्रस्तावना:-

आदिवासी विकास विभागांतर्गत येत असलेल्या शासकीय आश्रमशाळेतील विद्यार्थ्याकरिता उपयुक्त असे बालकांचे हक्क, मुल्य शिक्षण तसेच लैंगिक अत्याचार टाळण्यासाठी कायदा, नियम अस्तित्वात आहे. परंतू त्याबाबत शिक्षकांना व विद्यार्थ्यांना पुरेशी माहिती नाही. त्याकरिता जन जागृती करुन त्यात चांगले वाईट याबाबत माहिती व जबाबदाऱ्या, कर्तव्ये इत्यादीचा विचार करुन चित्रमय पध्दतीने जनजागृती करण्यासाठी आश्रमशाळेतील बालकांचे हक्क, मुल्य शिक्षण तसेच लैंगिक अत्याचार टाळण्यासाठी POCSO कायद्याबाबत जागृती, तसेच गुड टच- बॅड टच बाबत जागृती करण्यासाठी शासकीय आश्रमशाळा/ शासकीय वसतीगृहे/अनुदानीत शाळांमध्ये कॉफीटेबल बुक स्वरुपात चित्रमय पुस्तक उपलब्ध करुन देणेसाठी माध्यम आराखडा तयार करून देण्याची विनंती माहिती व जनसंपर्क महासंचालनालयास करण्यात आली होती. त्या अनुषंगाने कॉफीटेबल बुक स्वरुपात चित्रमय पुस्तक तयार करण्यासाठी रु. **२००.०० लक्ष** रक्कमेचा आराखडा माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाने तयार केला असून सदर आराखड्यास सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन शासन निर्णयान्वये गठित केलेल्या समितीमार्फत मान्यता देण्यात आलेली आहे. सदर आराखड्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

आदिवासी विकास विभागांतर्गत येत असलेल्या शासकीय आश्रमशाळेतील विद्यार्थ्याकरिता उपयुक्त असे बालकांचे हक्क, मुल्य शिक्षण तसेच लैंगिक अत्याचार टाळण्यासाठी POCSO कायद्याबाबत जागृती, तसेच गुड टच- बॅड टच बाबत जागृती करण्यासाठी शासकीय आश्रमशाळा/ शासकीय वसतीगृहे/अनुदानीत शाळांमध्ये कॉफीटेबल बुक स्वरुपात चित्रमय पुस्तक उपलब्ध करुन देणेसाठी माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाच्या माध्यम आराखडा नियोजन व अंमलबजावणी समितीच्या दिनांक १०/०२/२०२२ रोजी झालेल्या बैठकीत सादर केलेल्या रु. २००.०० लक्ष इतक्या किंमतीच्या मर्यादेत खालील माध्यम आराखड्यास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

| अ.क्र. | माध्यमाचा प्रकार | तपशील | दर | पुस्तकांची संख्या | एकूण रक्कम .रु) (लाखात |
|---|---|---|---|---|---|
| अ | कॉफीटेबल बुक | सचित्र (कार्टुनरुपी) माहिती पुस्तक, (कॉफीटेबल बुक स्वरुपात) (आ.वि.वि चे पत्र दि. १०.०३.२०२२ मधील नमूद तपशीलानुसार तयार करण्यात येईल. | १२८०/- | १५,००० | १,९२,००,००० |
| ब | प्रशासकीय खर्च (४%) | माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाला येणारा कार्यालयीन उपकरणावरील खर्च, सॉफ्टवेअर, तात्पुरता मनुष्य बळावरील खर्च, संशोधन खर्च, वाहतूक खर्च, इतर किरकोळ खर्च | | | ८,००,००० |
| **एकूण खर्च (अ +ब )** | | | | | **२,००,००,०००/-** |

२. याबाबतची देयके आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक यांच्या कार्यालयाकडून भागविण्यात यावीत. त्यानुषंगाने विषयांकित देयके आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक यांच्या कार्यालयाकडे थेट सादर करण्यात यावीत.

३. सदर प्रयोजनासाठी होणारा खर्च “मागणी क्र. टी-५, २२२५ अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण अनुसूचित जमातीचे कल्याण, ७९६ जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) (५९) मुलांसाठी व मुलींसाठी शासकीय वसतीगृह (२२२५ डी ७२५) बाब क्र. ५० इतर खर्च आणि (०१) (६०) आश्रमशाळा समूह (२२२५ डी ७३४) बाब क्र. ५० इतर खर्च व अनुदानित आश्रमशाळेसाठी (२२२५ एफ १२९) बाब क्र.३१ या लेखाशिर्षांतर्गत उपलब्ध तरतूदीमधून भागविण्यात येईल.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३१६१५५७०७१३२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

PANDURANG
MAHADU RAUT

Digitally signed by PANDURANG MAHADU RAUT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=ec808c56d3bb3b60878523fc0ccbc983f0564bce4be61987d7a67fda17b1a563,
pseudonym=AC2F10113E5C769CB22609F302DDA9C4D1BA86B0,
serialNumber=50079C895D3029AE5EAC55D486D32FE7E802A456919CE0FECF0DB5C303462F58, cn=PANDURANG MAHADU RAUT
Date: 2022.03.16 16:09:16 +05'30'

**( पांडुरंग म. राऊत )**

**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई.
२. मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई.
३. सचिव, आदिवासी विकास विभाग यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई.
४. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.

५. आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
६. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व अनुज्ञेयता) /(लेखापरीक्षा), मुंबई/नागपूर.
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. निवासी लेखापरीक्षा अधिकारी,मुंबई.
९. जिल्हा कोषागार अधिकारी,नाशिक.
१०.निवड नस्ती.